**ओळख परेड तसेच मृत्यूपूर्व जबानी नोंदविण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**

परिपत्रक क्र.सीआरटी-०९/प्र.क्र.२९०/पोल - ११,
गृह विभाग,
मंत्रालय, मुंबई - ३२.
दिनांक :- १९ जानेवारी, २०११.

संदर्भ :- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.विकाअ -०२००७ / ४४० / प्र.क्र.१७४ / २००७ / ५, दि.२५/०७/२००७.
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र.न्यायप्र-२००९/प्र.क्र.१७४/५, दि.२२ एप्रिल, २००९.

**परिपत्रक**

गुन्हा घडल्यानंतर गुन्हा अन्वेषणादरम्यान काही प्रकरणांमध्ये आरोपीची आळेख परेड घेण्यात येते. उपरोक्त शासन निर्णय, दिनांक २५/०७/२००७ अन्वये विशेष कार्यकारी अधिकारी (एसईओ) यांना ओळख परेड घेण्याचे अधिकार प्रदान करण्यात आलेले होते. तसेच विशिष्ट परिस्थितीत विशेष कार्यकारी अधिकारी यांच्याकडून मृत्यूपूर्व जबानी देखील नोंदविण्यात येत होती.

मा. मुंबई उच्च न्यायालयातील क्रिमिनल अपील क्र.५८/२००९ च्या संदर्भात मा.मुंबई उच्च न्यायालयाने दि.२६/०३/२००९ रोजी दिलेल्या निर्देशाप्रमाणे विशेष कार्यकारी अधिकारी यांना मृत्यूपूर्व जबानी नोंदविण्यासाठी बोलविण्यात येऊ नये व शासन निर्णय दि.२५/०७/२००७ च्या प्रपत्र "अ" मधील अ.क्र.(१) मधील (क) अन्वये विशेष कार्यकारी अधिकारी यांना देण्यात आलेला ओळख परेड घेण्याचा अधिकार मा.मुंबई उच्च न्यायालयाच्या पुढील आदेशापर्यंत रद्द करण्यात येत असल्याचे आदेश पारीत केले होते. त्यास अनुसरुन संदर्भाधीन अ.क्र.२ येथील शासन परिपत्रकान्वये मा.उच्च न्यायालयाचे आदेश सर्व संबंधितांच्या निर्दशनास आणण्यात आले होते.

मा.मुंबई उच्च न्यायालयाच्या दि.२६/०३/२००९ च्या आदेशानुसार पुढील आदेश हाईपर्यंत ओळख परेड तसेच मृत्यूपूर्व जबानी घेण्याचे काम जेथे शक्य आहे तिथे न्यायदंडाधिकारी यांच्यामार्फत व जेथे शक्य नाही तेथे महसूल विभागाचे नायब तहसिलदार

दर्जापेक्षा कमी नसलेल्या अधिकाऱ्याने करावे असे शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग, दि.२२/०४/२००९ अन्वये निर्देशित केलेले होते.

मा.उच्च न्यायालयाच्या उपरोक्त दि.२६/०३/२००९ च्या आदेशानुसार न्यायदंडाधिकारी यांचेमार्फत ओळख परेड किंवा मृत्यूपूर्व जबानी घेण्यात येत असलेल्या अडचणी विचारात घेवून मा.उच्च न्यायालयाच्या आदेशात सुधारणा करण्यात यावी, अशी विनंती मा.उच्च न्यायालयाला करण्यात आली होती. त्याअनुषंगाने मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि.२ सप्टेंबर, २०१० च्या निकालाद्वारे (क्रिमिनल अर्ज क्र.९०५/२०१०) ओळख परेड तसेच मृत्यूपूर्व जबानी घेण्याबाबत खालीलप्रमाणे अंतिम आदेश दिलेले आहेत.

**अ) ओळख परेड**

ओळख परेड घेण्याची तरतूद मा.मुंबई उच्च न्यायालयाच्या क्रिमिनल मॅन्युअलच्या चॅप्टर १ मधील नियम १६ (१) नमूद केलेली आहे. सदर तरतूदी विचारात घेता मा.मुंबई उच्च न्यायालयाने दि.२६/०३/२००९ रोजी न्यायदंडाधिकारी यांनी ओळख परेड घेण्याचे दिलेले आदेश मागे घेण्यात येत असून ओळख परेड घेण्यासाठी फौजदारी प्रक्रिया संहितेच्या कलम २० अन्वये नियुक्त कार्यकारी दंडाधिकारी (Executive Magistrate) किंवा विशेष कार्यकारी दंडाधिकारी (Special Executive Magistrate) यांची मदत घेण्यात यावी.

**ब) मृत्यूपूर्व जबानी**

मृत्यूपूर्व जबानी नोंदविण्यासाठी काही वेळा निर्माण झालेली तातडी विचारात घेता, मृत्यूपूर्व जबानी नोंदविण्यासाठी कुठलेही बंधन घालता येणार नाही व गरजेप्रमाणे कोणत्याही शिक्षित व्यक्तीकडून करण्यास प्रत्यवाय नाही. तथापि मृत्यूपूर्व जबानी योग्य प्रकारे नोंदविण्याच्या दृष्टीने जेथे शक्य आहे तेथे, जिल्हयामध्ये फौजदारी प्रक्रिया संहितेच्या कलम १३ अन्वये नियुक्त विशेष न्यायदंडाधिकारी (Special Judicial Magistrate) व मुंबईमध्ये कलम १८ अन्वये नियुक्त विशेष महानगर दंडाधिकारी (Special Metropolitan Magistrate) यांच्यामार्फत नोंदविण्यात यावी. त्याचप्रमाणे कार्यकारी दंडाधिकारी तसेच विशेष कार्यकारी दंडाधिकारी यांच्यामार्फत देखील मृत्यूपूर्व जबानी नोंदविण्यात यावी.

सबब ओळख परेड घेताना तसेच मृत्यूपूर्व जबानी नोंदविताना सर्व संबंधितांनी वरिलप्रमाणे कार्यवाही करावी.

प्रस्तुत शासन परिपत्रक शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून संगणक सांकेतांक क्र. २०११०११८२०३९५३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( नं. म. शिंदे )
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मुख्य सचिव,
सर्व मंत्रालयीन विभागांचे अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
सर्व पोलीस आयुक्त, महाराष्ट्र राज्य,
सर्व जिल्हा पोलीस अधीक्षक, महाराष्ट्र राज्य,
संचालक, अभियोग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
संचालक, शासकीय मुद्रणालय, शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई,
सामान्य प्रशासन विभागातील कार्यासन - ५,
गृह विभागातील सर्व कार्यासने,
निवडनस्ती / (पोल - ११).